**डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कार सामाजिक क्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्तींची व सामाजिक संस्थांची सन २०१३-१४ करीता निवड करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : सभूपू-२०१४/ प्र.क्र. ९१/ बांधकामे**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : २५ जून, २०१४

**वाचा :**

१) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक: एससीडब्ल्यु- १०८६/ १५५५/ (२१६)/ मावक-४, दिनांक २०/०२/१९८९.

२) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक: दमिपु- २००१/ प्र.क्र. १८६/ मावक-४, दिनांक २५/०७/२००१

३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: बीसीएच -२०१२/ प्र.क्र. ४७/ बांधकामे, दिनांक ०२/०४/२०१२

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : बीसीएच -२०१४/ प्र.क्र. ९१/ बांधकामे, दिनांक २४/०६/२०१४

५) शासन शुध्दीपत्रक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : बीसीएच -२०१४/ प्र.क्र. ९१/ बांधकामे, दिनांक २५/०६/२०१४

६) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे क्रमांक: सकआ/ मावक/डॉ. बाआंसभूपु/ २०१४-१५/ कार्या-१२/ ५५२, दिनांक २५/०६/२०१४

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासनाने अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय जाती कल्याण, शारिरीक व मानसिकदृष्टया अपंग कुष्ठरोगी वगैरेंसाठी तसेच समाजकल्याण क्षेत्रात मौलिक कार्य करणाऱ्या राज्यातील सामाजिक कार्यकर्त्यांचा गौरव करावा, सामाजिक क्षेत्रात काम करीत असलेल्या समाजसेवकांच्या कामाची दाद घ्यावी व इतर कार्यकर्त्यांना त्यापासून प्रेरणा मिळावी, जेणे करुन सामाजिक उत्थानासाठी कार्यकर्ते सरसावून पुढे यावेत यासाठी शासनाने सन १९७१-७२ पासून व्यक्तीसाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलित मित्र पुरस्कार योजना सुरु केलेली आहे. सन १९८९ पासून संस्थांना पुरस्कार देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. दरवर्षी ५१

व्यक्ती व १० संस्थांना दरवर्षी पुरस्कार देण्यात येतो. सदर पुरस्कारसाठी प्रती व्यक्ती रु. १५,०००/- व प्रती संस्था रु. २५,०००/- इतकी रक्कम निश्चित केली आहे. सन २०१३-१४ करीता डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कारासाठी सामाजिक क्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्तींची व सामाजिक संस्थेची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती

**शासन निर्णय—**

सन २०१३-१४ करीता डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कारासाठी सामाजिक क्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्तींची तसेच संस्थेंची निवड करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीची बैठक दि. २४/०६/२०१४ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर निवड समितीने डॉ. बा ाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कारासाठी शिफारस केलेल्या व्यक्तींची नावे सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये व संस्थेंची नावे सोबतच्या परिशिष्ट "ब" मध्ये दर्शविण्यात आली असून त्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर आदेश पुरस्कारासाठी निवडलेल्या व्यक्ती पुरस्काराबाबत विहित केलेले निकष पूर्ण करीत आहेत व सदर व्यक्ती हयात आहेत या अटीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कारासाठी निवड करण्यात आलेल्या व्यक्तींना शासन निर्णयात विहित केलेल्या सर्व सोयी सुविधा लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२३१६५८३१३०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.07.23 16:55:55 +05'30'

**शिवाजी चौरे**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

४. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

५. सर्व मा. राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.

१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

११.सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय.

१२.सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.

१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१४.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग

१५.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण

१६.सर्व संबंधित व्यक्ती/ संस्था.

१७.निवड नस्ती/ बांधकामे, सा.न्या. व वि. स. विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय, क्रमांक : सभूपू- २०१४/ प्र.क्र. ९१/ बांधकामे,**

**दिनांक २५ जून, २०१४ चे "परिशिष्ट-अ"**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कार सन २०१३-१४

पुरस्कारासाठी निवड केलेल्या व्यक्तींची नावे व पत्ते.

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **पुरस्कारासाठी निवड केलेल्या व्यक्तीचे नांव व पत्ता** |
|---|---|---|
| १ | जळगाव | श्री. शब्बीर अली नियाज अली सय्यद,<br>रा. ३९, गणपतीनगर, कुणाल अपार्टमेंट, जळगाव |
| २ | अमरावती | श्री. तेजलाल हुकूमचंद अग्रवाल,<br>तकतमल कॉलेज, राजापेठ, अमरावती |
| ३ | मुंबई | श्री. बबन ज्ञानु मोरे,<br>८२/ ५६ वरळी बी.डी.डी. चाळ हुतात्मा रमेश देवरुखकर मार्ग महेंद्र टॉवर समोर वरळी |
| ४ | मुंबई | श्री. वसंत आनंदराव कांबळे,<br>गौतम कॉलनी, आरे कॉलनी, गोरेगाव ६५ मुंबई |
| ५ | भंडारा | श्री. जयप्रकाश हरीराम भवसागर,<br>रा. आंबेडकर वार्ड तुमसर, जि. भंडारा |
| ६ | सोलापूर | श्री. बाळासाहेब हरी गायकवाड,<br>रा. अकलूज ता. माळशिरज जि. सोलापूर |
| ७ | सांगली | श्री. प्रताप ऊर्फ बाळासाहेब धोंडिबा पाटिल,<br>इस्लामपूर जि. सांगली |

**शासन निर्णय, क्रमांक : सभूपू- २०१४/ प्र.क्र. ९१/ बांधकामे,**

**दिनांक: २५ जून, २०१४ चे "परिशिष्ट - ब"**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कार सन २०१३-१४

पुरस्कारासाठी निवड केलेल्या संस्थेची नावे व पत्ते

| अ.क्र. | जिल्हा | पुरस्कारासाठी निवड केलेल्या संस्थेचे नांव व पत्ता |
|---|---|---|
| १ | औरंगाबाद | कै. मुंजाजीराव शिक्षण प्रसारक मंडळ,<br>सिडका, औरंगाबाद |
| २ | अकोला | महर्शी मार्कंडेय मागासवर्गीय बहुद्देशिय संस्था,<br>अकोला |
| ३ | यवतमाळ | लोकसेवा शिक्षण प्रसारक मंडळ उमरखेड,<br>जि. यवतमाळ |
| ४ | अकोला | विदर्भ विकास महिला बाल कल्याण शिक्षण संस्था,<br>अकोला |

****************